सिंचन स्थिती दर्शक अहवालामध्ये देण्यात येत असलेली माहिती महामंडळनिहाय देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## जलसंपदा विभाग

## शासन निर्णय क्रमांकः सिंविचौसअ/(५४/२०१४)/सिं.व्य.(सां)

मंत्रालय, मुंबई-३२.

दिनांक : ०६ डिसेंबर, २०१४

**वाचा** : शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्र.संकीर्ण २०१४/(२४८/१४)/मोप्र-२, दि.२५ ऑगस्ट, २०१४

**प्रस्तावना**

राज्यातील सिंचन विषयक तपासणीकरिता शासनाने नेमलेल्या चितळे समितीच्या कार्यपालन अहवालात मान्य करण्यात आलेल्या सुधारणांची अंमलबवजाणी करण्याबाबत शासन स्तरावर अपर मुख्यसचिव (नियोजन) यांच्या अध्यक्षतेखाली वरीष्ठ पातळीवरील अधिकाऱ्यांची समिती संदर्भीय शासन निर्णयान्वये स्थापन करण्यात आलेली आहे. विशेष चौकशी समितीने सिंचन स्थिती दर्शक अहवालात समाविष्ट करावयाच्या माहिती संदर्भात खालील प्रमाणे सुधारणा सुचविल्या आहेत.

"सिंचन स्थिती दर्शक अहवाल जलसंपदा विभागाकडून दरवर्षी प्रकाशित केला जातो. सदर अहवालात सद्यस्थितीत विभागनिहाय माहिती संकलीत केली जाते. ही माहिती महामंडळनिहाय व मोठया, मध्यम प्रकल्पनिहाय दिली जावी. त्यात लघु प्रकल्पांचा जिल्हानिहाय, महामंडळनिहाय खोरे व उपखोरेनिहाय गोषवाराही असावा. या अहवालामध्ये धरणांमध्ये पुढील वर्षासाठी किती पाणीसाठा राखीव ठेवला आहे याचा तपशिल प्रकल्पवार द्यावा. तसेच बिगर सिंचन पाणी वापरामध्ये इतर पाणीवापर या शिर्षाखाली येणाऱ्या पाणीवापराच्या तपशिलाचाही अहवालात समावेश करावा ".या सुधारणेच्या अनुषंगाने आवश्यकनिर्णय घेण्याचा प्रस्ताव शासनाचे विचाराधीन होता.

**शासन निर्णय** :-

सिंचन स्थिती दर्शक अहवालामध्ये सद्य:स्थितीत विभागनिहाय माहिती संकलीत करण्यात येत आहे.ही माहिती महामंडळनिहाय असावी अशी शिफारस विशेष चौकशी समितीने केली आहे. तरी याद्वारे अशा सूचना देण्यात येत आहेत की ,सदरहू माहिती महामंडळनिहाय व मोठया , मध्यम प्रकल्पनिहाय देण्यात यावी.त्यात लघु प्रकल्पांचा जिल्हानिहाय ,महामंडळनिहाय खोरे व उपखोरेनिहाय गोषवाराही असावा .या अहवालामध्ये धरणांमध्ये पुढील वर्षासाठी किती पाणीसाठा राखीव ठेवला आहे यांचा तपशिल प्रकल्पवार असावा. तसेच बिगर सिंचन पाणी वापरामध्ये" इतर पाणी वापर"या शिर्षाखाली येणा-या पाणी वापराच्या तपशिलाचाही अहवालात समावेश करावा .मुख्य अभियंता महाराष्ट्र जलसंपती विकास केंद्र, औरंगाबाद यांनी या प्रमाणे माहिती एकत्रित करून सिंचन स्थिती दर्शक अहवालामध्ये समाविष्ट करावी .

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२०८१४३५१६७०२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjiv Arunkant Tatu

Digitally signed by Sanjiv Arunkant Tatu
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjiv Arunkant Tatu
Date: 2014.12.08 14:46:28 +05'30'

**सं.अ.टाटू**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महासंचालक, वाल्मी, औरंगाबाद
२. सर्व कार्यकारी संचालक ,
३. मुख्य अभियंता (द व प्र) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
४. मुख्य अभियंता (पा) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
५. मुख्य अभियंता, औरंगाबाद, म़हाराष्ट्र जलसंपत्ती विकास केंद्र
६. सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग,
७. सर्व अधिक्षक अभियंता, जलसंपदा विभाग,
८. सिंव्य.संग्रहार्थ.